**विशेष कार्यकारी अधिकारी म्हणून नियुक्तीबाबतचे सुधारित निकष आणि कार्यपध्दती निश्चित करण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- विकाअ-१११५/प्र.क्र.८८/का.५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २४ मे, २०२३.

**वाचा:-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.विकाअ-१११५/प्र.क्र.८८/५, दि.३१/१२/२०१५.
**पूरक पत्र:-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.विकाअ-१११५/प्र.क्र.८८/५, दि.१५/०३/२०१६.

**प्रस्तावना :-**

राज्यातील विशेष कार्यकारी अधिकारी पदावरील नियुक्तीबाबतचे निकष संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक ३१ डिसेंबर, २०१५ आणि पूरकपत्र दि.१५ मार्च, २०१६ अन्वये निश्चित करण्यात आले आहेत. त्यानुसार जिल्हाधिकारी यांच्याकडून विशेष कार्यकारी अधिकारी पदावर नियुक्ती करण्याबाबतचे प्रस्ताव शासनास सादर करण्यात येतात. सदर प्रस्ताव संबंधित जिल्ह्याचे मा.पालकमंत्री व मा.मुख्यमंत्री यांच्याकडे अंतिम मान्यतेकरीता सादर केले जातात. सदर मान्यता प्राप्त झाल्यानंतर विशेष कार्यकारी अधिकारी यांच्या नियुक्ती करण्याबाबत संबंधित जिल्हाधिकारी यांना शासन स्तरावरुन कळविण्यात येते.

संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ४ खालील (४.१) नुसार विशेष कार्यकारी अधिकारी यांच्या नियुक्तीबाबतचे विहित नमुन्यातील अर्ज जिल्हाधिकारी यांनी पूर्वचारित्र्य पडताळणीसाठी संबंधीत पोलीस अधीक्षक/ पोलीस आयुक्त यांच्याकडे पाठवावयाचे आहेत. पोलीसांकडून पडताळणी अहवाल प्राप्त झाल्यानंतर त्या सर्व उमेदवारांच्या नावांची यादी शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावयाची आहे. सदर पोलीस पडताळणी अहवाल प्राप्त होण्यास बऱ्याचदा वेळ लागत असल्यामुळे विशेष कार्यकारी अधिकाऱ्यांच्या नियुक्तीस विलंब होत असतो. त्याअनुषंगाने पोलिस पडताळणी आणि विशेष कार्यकारी अधिकारी यांची यादी मंजुरीच्या कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-. विशेष कार्यकारी अधिकारी यांच्या नियुक्तीच्या कार्यपध्दतीमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यास शासन मान्यता देत आहे.

१) जिल्हाधिकारी यांच्याकडून विशेष कार्यकारी अधिकारी यांच्या नियुक्तीसाठी यापुढे शासनास प्रस्ताव सादर करण्याची आवश्यकता राहणार नाही. जिल्हाधिकारी यांनी विशेष कार्यकारी अधिकारी या पदाच्या उमेदवाराकडून प्राप्त झालेले अर्ज व मा.पालकमंत्री यांच्याकडून प्राप्त झालेली शिफारस लक्षात घेऊन त्यांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित करावे.

२) विशेष कार्यकारी अधिकारी यांच्या नियुक्तीसाठी संदर्भाधीन दिनांक ३१ डिसेंबर,२०१५ च्या शासन निर्णयान्वये परिशिष्ट १ मधील उमेदवाराची माहिती व प्रतिज्ञापत्र या संदर्भात पोलिस पडताळणीस बराच कालावधी लागत असल्याने विशेष कार्यकारी अधिकारी यांच्या नियुक्तीस विलंब होत असतो. त्या अनुषंगाने विशेष कार्यकारी अधिकारी या पदासाठी उमेदवारांकडून प्राप्त झालेले अर्ज व मा.पालकमंत्री यांच्याकडून शिफारस प्राप्त करताना जिल्हाधिकारी यांनी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट १(अ) नुसार उमेदवाराचे स्वय: घोषणापत्र प्रथम घेण्यात यावे.

३) जिल्हाधिकारी यांच्याकडून स्वय: घोषणापत्राच्या आधारे विशेष कार्यकारी अधिकाऱ्यांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित केल्यानंतर नियुक्त विशेष कार्यकारी अधिकारी यांची पोलिस पडताळणी ही संदर्भाधीन दिनांक ३१ डिसेंबर,२०१५ च्या शासन निर्णयान्वये परिशिष्ट १ मधील माहिती व प्रतिज्ञापत्रानुसार पुढील सहा महिन्यांत करुन घेणे बंधनकारक राहील.

४) जिल्हाधिकारी यांच्याकडून प्राप्त होणाऱ्या पोलिस पडताळणीचे प्रस्ताव पोलिस अधिक्षक/पोलिस आयुक्त यांच्याकडून सहा महिन्याच्या आत संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे पडताळणी करून पाठवणे बंधनकारक राहील.

५) जिल्हाधिकारी यांच्याकडून नियुक्त विशेष कार्यकारी अधिकारी यांचे पोलिस पडताळणी अहवाल नकारात्मक प्राप्त झाल्यास संबंधितांची नियुक्ती जिल्हाधिकाऱ्यांनी तात्काळ रद्द करुन त्यांच्यावर चुकीचे स्वयं: घोषणापत्र व परिशिष्ट १(अ) मधील माहिती व प्रतिज्ञापत्र सादर केल्याबद्दल नियमोचित कार्यवाही त्वरीत करावी.

**२.** वरील सुधारणा व्यतिरिक्त शासन निर्णय दिनांक ३१ डिसेंबर, २०१५ आणि पूरकपत्र दिनांक १५ मार्च, २०१६ मधील इतर तरतुदी व निकष लागू राहतील.

**३.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०५२४१६२६२९८८०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAXMIKANT GOPALRAO DHOKE

Digitally signed by LAXMIKANT GOPALRAO DHOKE
DN: CN = LAXMIKANT GOPALRAO DHOKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Date: 2023.05.24 16:29:31 +05'30'

**(ल.गो. ढोके)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,

५. मा.अध्यक्षांचे सचिव, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
६. मा.सभापतीचे सचिव, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
८. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
९. सर्व मा.विधानसभा/विधान परिषद व मा. संसद सदस्य,
१०. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२,
११. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
१२. प्रधान सचिव (कामगार), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१३. सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१५. सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी,
१६. आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, मुंबई,
१७. आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व),
१८. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१९. पोलीस महासंचालक, मुंबई/सर्व पोलीस आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
२०. सर्व पोलिस आयुक्त/जिल्हा पोलीस अधीक्षक,
२१. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद,
२२. राज्य महिला आयोग, मुंबई,
२३. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२०,
२४. शिवसेना, आनंद आश्रम, श्री भवानी चौक,टेंभी नाका ,ठाणे पश्चिम -४००६०१
२५. शिवसेना, (उध्दव बाळासाहेब ठाकरे), शिवसेना भवन, राम गणेश गडकरी चौक, दादर पश्चिम, मुंबई-२८
२६. इंडीयन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५,
२७. राष्ट्रवादी काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२१,
२८. बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमॅट, आझाद मैदान, मुंबई-१,
२९. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४,
३०. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅर्लस, वरळी, मुंबई-१३,
३१. संचालक, शासकीय मुद्रणालय, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई,
३२. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने/संग्रहासाठी,
३३. निवडनस्ती (कार्यासन-५).

**शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र.विकाअ-१११५/प्र.क्र.८८/५, दिनांक २४ मे २०२३ सोबतचे परिशिष्ट**

**परिशिष्ट- "१" (अ)**

**स्वय: घोषित पत्राचा नमुना**

मी श्री./श्रीमती ------------------------------------------- वय ------ वर्षे राहणार--------------------------याव्दारे स्वय: घोषित करतो/ करते की, शासन निर्णय दिनांक ३१ डिसेंबर २०१५ अन्वये विहित केलेले वय, शैक्षणिक पात्रता व वास्तव्य इत्यादी निकष पूर्ण करत असून माझ्यावरील फौजदारी गुन्हा/खटला इत्यादी बाबत मी दिलेली सर्व माहिती सत्य आहे. तसेच मी सादर केलेली सर्व कागदपत्रे खरी आहेत.

जर मी वर दिलेली माहिती खोटी अथवा चुकीची आहे असे पोलीस पडताळणी अंती निदर्शनास आल्यास माझी विशेष कार्यकारी अधिकारी पदावर झालेली नियुक्ती संपुष्टात येईल तसेच शासनाकडून करण्यात येणाऱ्या कारवाईस मी पात्र राहीन. माझ्या कुटूंबातील माझ्याशिवाय अन्य कुठल्याही व्यक्तीची, विशेष कार्यकारी अधिकारी म्हणून नियुक्ती केलेली नाही.

ठिकाण:-　　　　　　　　　　　　　　　　　　　　अर्जदाराची स्वाक्षरी

दिनांक:-